**सन २०२२-२३ मध्ये "डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता" या योजनेकरीता निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एडीआर-२०२३/प्र.क्र.२६/तांशि-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक: २७ मार्च, २०२३.

वाचा: -

१)शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०१७/प्र. क्र. ३३२/तांशि ४, दि.७ ऑक्टोबर, २०१७.
२)शासन निर्णय क्र. एडीआर २०१८/प्र क्र. १३७/तांशि६ दिनांक १६ नोव्हेंबर, २०१९
३)शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४/०४/२०२२.
४)शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६/०३/२०२३.
५)उपसंचालक, कला संचालनालय यांचे पत्र क्र.डिओअे-२०२३/दोन/५३७, दि.२४/०३/२०२३.

**प्रस्तावना:-**

"डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता" या योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०२२-२३ मध्ये विद्यार्थ्यांची निर्वाह भत्त्याची रक्कम अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. ५ च्या पत्रान्वये उपसंचालक, कला संचालनालय यांनी सादर केला आहे.

**शासन निर्णय**:-

कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील निवडक ९ व्यावसायिक अभ्यासक्रमांचा संदर्भ क्र. १ येथील दिनांक ७ ऑक्टोबर,२०१७च्या शासन निर्णयान्वये "डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता" योजनेमध्ये समावेश करण्यात आला आहे. सदर योजनेचा लाभ देण्यासाठी संदर्भ क्र. २ येथील दि.१६ नोव्हेंबर, २०१९च्या शासन निर्णयान्वये नवीन लेखाशिर्ष निर्माण करण्यात आले आहे. संदर्भ क्र. ४ येथील वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६/०३/२०२३ अन्वये सन २०२२-२३ वर्षाकरीता निधी वितरणाबाबत आदेश निर्गमित केले आहेत. त्यामध्ये काही उद्दिष्टांसाठी निधी वितरीत करण्यासाठी सुधारीत अदांजाच्या मर्यादेत टक्केवारी निश्चित केली आहे. त्यानुसार "३४, शिष्यवृत्ती/विद्यावेतने" या उद्दिष्टासाठी १०० टक्के मर्यादा निश्चित केली आहे.परंतु सुधारीत अदांजामध्ये डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता या योजनेसाठी रू. १४.२५ लाख इतकी रक्कम निश्चित केली आहे.

त्यास अनुसरून "डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता" या योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०२२-२३ मध्ये विद्यार्थ्यांच्या निर्वाह भत्ताची रक्कम अदा करण्यासाठी चालू वर्षी अर्थसंकल्पित झालेला रु. १५.०० लाखापैकी सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत म्हणजेच रु.१४.२५ लाख इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रुपये लाखात)

| अर्थसंकल्पित निधी | बीम्सवर उपलब्ध निधी | वितरीत केलेला निधी |
|---|---|---|
| १५.०० | १४.२५ | १४.२५ |

०३. मागणी क्र ४, डब्ल्यू ४, २२०५-कला व संस्कृती, ००,१०१-ललित कला शिक्षण, (०१) कला संचालनालय,(०१)(०४)(कार्यक्रम) डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना (२२०५३६०८) (३४-शिष्यवृत्या/विद्यावेतने) या लेखाशिर्षाखाली खर्ची दर्शविण्यात येईल व तो चालू आर्थिक वर्षात मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात येईल.

०४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०४/०४/२०२२ व दि.०८/०२/२०२३ अन्वये विभागास प्राप्त वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा सांकेतांक २०२३०३२८१३३३३२९२०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by HUSSEIN ALIMIYA MUKADAM
Date: 2023.03.28 13:40:01 +05'30'

**( हुसेन अ. मुकादम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
३) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) नियोजन विभाग/वित्त विभाग, व्यय-५/अर्थसंकल्प-८, मंत्रालय, मुंबई.
७) कक्ष अधिकारी/साशि-१, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती तांशि-६.